दि.२ मे, २०१२ नंतर नियुक्त शिक्षकांच्या वैयक्तिक मान्यतेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन परिपत्रक क्र.एसएसएन-२०१६/प्र.क्र.५६/१६/टीएनटी-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०१६.

वाचा : १) महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१
२) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०११/(४४७/११)(अ)/प्राशि-३, दि.२.५.२०१२
३) शासन निर्णय क्र.एसएसएन-२०१४/प्र.क्र.१/१४/टीएनटी-२, दि.२०.६.२०१४
४) शासन निर्णय क्र.एसएसएन-२०१४/प्र.क्र.१/१४/टीएनटी-२, दि.१९.७.२०१४
५) शासन निर्णय क्र.एसएसएन-२०१४/प्र.क्र.१/१४/टीएनटी-२, दि.१९.८.२०१४
६) शासन निर्णय क्र. एसएसएन-२०१४/प्र.क्र.१/१४/टीएनटी-२, दि.४.६.२०१६
७) शासन पत्र क्र.संकीर्ण-२०१६/सं.क्र.१६८/१६/टीएनटी-२, दि.१.७.२०१६

परिपत्रक

संदर्भाधीन क्र.२ शासन निर्णय दि. २ मे, २०१२ रोजीच्या अटीनुसार अतिरिक्त कर्मचाऱ्यांचे १०० टक्के समायोजन झाल्याशिवाय रिक्त पदांवर भरती करण्यात येऊ नये असा निर्णय घेण्यात आला होता. तथापि काही खाजगी शैक्षणिक संस्थांनी जाहिरातीस ना-हरकत प्रमाणपत्र न घेता दि.२.५.२०१२ नंतर पदभरती केलेली असून सदर पदांना वैयक्तिक मान्यता मिळणेबाबत प्रस्ताव सादर करण्यात येत आहेत. संदर्भाधीन क्र.३, ४ व ५ च्या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व आयुक्त (शिक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमून खाजगी शाळांतील पदभरतीस परवानगी दिलेली आहे. मात्र अशा पदभरतीस परवानगी देताना महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) विनियमन अधिनियम १९७७ मधील कलम ५(१) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यास अतिरिक्त पदे असल्यास पदभरती करता येणार नाही, अशी तरतूद आहे.

२. रिट याचिका क्र.६६०६, ६६०७/२०१५ मध्ये माध्यमिक शिक्षकांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दाखल केलेल्या याचिका प्रकरणी संबंधित दिनांक १७.६.२०१६ रोजी दिलेल्या आदेशातील याबाबतचे मुद्दे पुढीलप्रमाणे :

> 20. Respondant no.2 shall at the end of enquiry pass suitable orders about grant or rejection of approval to the employment of all the petitioners including the petitioners in Writ Petition Nos. 165 of 2016 and 232 of 2016. The further continuation of the petitioners in service shall depend upon the said decision. Contingent upon the said approval, we also

grant the petitioners/employees liberty to claim their salary from their respective Managements. If approval is granted, the Management shall be free to claim reimbursement from the Government. If the approval is not granted, the salary shall not be reimbursed.

21. We also direct the respondent that hereinafter no "no objection" for recruitment or permission to effect direct recruitment shall be granted except with express certification by the Deputy Director of Education of concerned division stating that no surplus teachers to teach the concerned subjects are available for absorption in State. This order shall be circulated by the respondent no.1 to all its Deputy Directors as also to all its Education Officers and also to all its Managements with a period of 15 days from today.

मा.उच्च न्यायालयाच्या उक्त आदेशानुसार यापुढे रिक्त पदभरतीस ना-हरकत प्रमाणपत्र देताना किंवा पदभरती करताना संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक / शिक्षणाधिकारी यांनी अतिरिक्त शिक्षक उपलब्ध नसल्याचे प्रमाणित केल्याशिवाय पदभरती करण्यात येऊ नये, असे आदेश दिले आहेत. त्यानुसार मा.न्यायालयाने आदेशित केल्यानुसार संबंधित कर्मचाऱ्यास मान्यता प्राप्त झाल्यास शासनाकडे अनुदानासाठी दावा करता येईल अन्यथा नाही या अटीवर शाळा व्यवस्थापनाने कर्मचाऱ्यांस वेतन अदा करावे तसेच ना-हरकत प्रमाणपत्राशिवाय पदभरती केलेल्या पदांना वैयक्तिक मान्यता देण्यात येऊ नयेत अशा स्पष्ट सूचना दि.१.७.२०१६ च्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

२. सबब, सदर परिपत्रकाद्वारे सूचित करण्यात येते की, दि.२.५.२०१२ नंतर राज्यातील प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक/कनिष्ठ महाविद्यालयातील ना-हरकत प्रमाणपत्राशिवाय करण्यात आलेल्या शिक्षक/शिक्षकेतर पदभरतीस कोणत्याही परिस्थितीत मान्यता देण्यात येऊ नये. दि.२.५.२०१२ नंतर करण्यात आलेल्या पदभरतीस मान्यता दिल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित प्राधिकाऱ्यावर शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल. तसेच आवश्यक वाटल्यास फौजदारी गुन्हा दाखल करण्यात येईल, याची नोंद घ्यावी

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२७१५३८४८६३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2016.10.27 15:42:57 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई,
२. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई,
४. शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे-१,
५. शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे-१,
६. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे,
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
९. सर्व शिक्षणाधिकारी ( प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद,
१०. खाजगी सचिव, मा.मंत्री शालेय शिक्षण,मंत्रालय,मुंबई,
११. शिक्षण निरिक्षक, बृहन्मुंबई (दक्षिण /पश्चिम /उत्तर)
१२. निवडनस्ती, ( टीएनटी-२ )